**सन २०२३-२४ करिता निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६-२२९५) या राज्य योजनेअंतर्गत मौ. सोनसळ, ता.कडेगांव जि.सांगली येथील श्री.चौरंगीनाथ या निसर्ग पर्यटन स्थळावर कार्यरत असलेल्या ६ अस्थायी पदांच्या वेतनावरील खर्च भागविण्याकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.८९/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २२ मे, २०२३

**वाचा :-**

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.२६/फ-९, दिनांक १०.३.२०२३
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल, २०२३
३. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२६/८४/२०२३-२४, दिनांक ३.५.२०२३

**<u>प्रस्तावना :-</u>**

सन २०२३-२४ करिता निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६-२२९५) या लेखाशिर्षांतर्गत रुपये १५५७०.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ चे परिपत्रकान्वये वित्तीय वर्ष सन २०२३-२४ करिता अर्थसंकल्पीय तरतूदीची मासिक निधी विवरणपत्रे, अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०२३-२४ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२३ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ७०% च्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना देण्यात आलेल्या आहेत.

निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास या योजनांतर्गत मौ.सोनसळ ता.कडेगांव जि.सांगली येथील श्री.चौरंगीनाथ या निसर्ग पर्यटन स्थळावर कार्यरत असलेल्या ६ अस्थायी पदांना पुढे चालू ठेवण्यास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

सदर योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या नियतव्ययाच्या अनुषंगाने प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये **०१-वेतन रु.३२.७५ लक्ष** इतक्या रकमेचा चालू बाब प्रस्ताव मान्यतेस्तव सादर केला आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यानी संदर्भ क्र.३ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाचे संदर्भ क्र.२ येथील परिपत्रक व BDS वितरण प्रणालीवर उपलब्ध अनुदान विचारात घेता, **निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६-२२९५) या योजनेमधून मौ.सोनसळ ता.कडेगांव जि.सांगली येथील श्री.चौरंगीनाथ या निसर्ग पर्यटन स्थळावर कार्यरत असलेल्या ६ अस्थायी पदांच्या वेतनावरील खर्च भागविण्याकरीता सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात ०१-वेतन अंतर्गत रु.७.०० लक्ष** इतका निधी खालील अटी व शर्तींचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.
२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.
३. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
४. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
५. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.
६. सदर आर्थिक वर्ष २०२३-२४ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.
७. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

८. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांनी उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

९. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

१०.सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक १२.४.२०२३ रोजीचे परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

११.सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक-सी-०७ प्रधान शिर्ष- २४०६, वनिकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) ०१- वेतन या लेखाशिर्षा अंतर्गत सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १२.४.२०२३ चे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५२२१७०७४२४२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PINGALE BHANUDAS NARAYAN

Digitally signed by PINGALE BHANUDAS NARAYAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=cd9b7c852f06815dc15baee9beaa952cb59250169fcb3d489150789e0cc31ca6, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6025E577A0EE54FAED5D6081093A5E1F8E2B15125A14DDE66E1EA3AFA9BC2CF5, cn=PINGALE BHANUDAS NARAYAN
Date: 2023.05.22 17:11:05 +05'30'

**( भा. ना. पिंगळे )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर

३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर

४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.) कोल्हापूर

५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

६. सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.

७. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

८. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

९. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती).